**लातूर मंडळाच्या अधिपत्याखालील कुटीर रुग्णालय, नेकनूर जि.बीड येथील ३ अस्थाई पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०१५/प्र.क्र.६३/आरोग्य-४**
१० वा मजला, कॉम्पलेक्स बिल्डींग,
जी.टी.हॉस्पिटल आवार, मुंबई.
तारीखः २४ एप्रिल, २०१५.

वाचा

१) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः पीएससी-१०८१/१२३६/१९८१/आ-४, दि.२.०६.१९८१.**
२) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः आरएलएच-२५९३/६८८/प्र.क्र.१२७/आ-४, दि.२५.०४.२००७**
३) **शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांकः अस्थाई-२०१०/प्र.क्र.४३/आरोग्य-४, दि.११.०८.२०१०.**
४) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०११/प्र.क्र.९१/आरोग्य-४, दि.२८.०४.२०११.**
५) **शासन निर्णय, सा.आ.वि., क्रमांकः अपदे-२०१४/प्र.क्र.६६/आरोग्य-४, दि.२९.०४.२०१४.**
६) **सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र, क्र.संआसे/कक्ष-३/टे-५/कु.रु.नेकनुर/अपदे-३/सन२०१५-१६/२२४६-४७/१५, दि.२०.०२.२०१५.**

शासन निर्णय

संदर्भाधीन क्र.४ च्या शासन निर्णयान्वये कुटीर रुग्णालय, नेकनूर, जि.बीड येथील २७ अस्थाई पदांपैकी ८० टक्के पदे म्हणजेच २४ पदांचे स्थायीकरण करण्यात आलेले आहे. उपरोक्त शासन निर्णय क्र.५ अन्वये कुटीर रुग्णालय, नेकनूर, जि.बीड येथील उर्वरित ३ अस्थाई पदांना दि.१.०३.२०१४ ते दि.२८.०२.२०१५ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. आता सदर ३ अस्थाई पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक कालावधीसाठी रिक्त नव्हती वा अतिरिक्त कार्यभार दिलेला नाही, या अटींच्या अधीन राहून सोबतच्या विवरणपत्रात दर्शविलेली ११७ अस्थाई पदे दि.१.०३.२०१५ ते दि.२९.०२.२०१६ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर पदांपैकी एकही पद ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असल्याचे आढळून आल्यास त्याची संपुर्ण जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांची राहील.

या पदांवरील खर्च सन २०१५-१६ या आर्थीक वर्षाच्या मागणी क्रमांक आर-१ मधील मुख्य लेखाशीर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०१-नागरी आरोग्य सेवा व विषम चिकित्सा, ११०- रुग्णालये व दवाखाने, ११०-१ मुफसल रुग्णालये व दवाखाने (०५) (०१) -कुटीर रुग्णालये (२२१० ०३१५) ” करीता मंजुर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय,क्र.असंक-१००४/ प्र.क्र.१२ ( भाग-२ )( २००४)/ वित्तिय सुधारणा-१, दि.४.१०.२००४ अन्वये प्रशासकीय विभागप्रमुखांना प्रदान केलेल्या अधिकारात निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४२४११२८२४१७१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay D Kamalakar

Digitally signed by Sanjay D Kamalakar
DN: CN = Sanjay D Kamalakar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Under Secretary
Date: 2015.04.24 13:30:46 +05'30'

**संजय कमलाकर**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
२. सहसंचालक, आरोग्य सेवा ( रूग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा ( अर्थ व प्रशासन ), पुणे.
४. सहाय्यक संचालक, आरोग्य सेवा ( लेखा व लेखापरिक्षा ), पुणे.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, लातूर मंडळ, लातूर.
६. महालेखापाल, १/२,महाराष्ट्र ( लेखा व लेखा परिक्षा ) (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई/ नागपूर.
७. जिल्हा शल्य चिकित्सक, बीड.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, बीड.
९. वित्त विभाग (व्यय-१३, अर्थसंकल्प-१९ ), मंत्रालय, मुंबई.
१०.अवर सचिव ( सेवा-२/ सेवा-३/ सेवा-५ /अर्थसंकल्प ), सा.आ.वि., मंत्रालय, मुंबई.
११.निवडनस्ती ( आरोग्य- ४ ).

विवरण पत्र - अ

शा.नि.सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०१५/प्र.क्र.६३/आरोग्य-४ दिनांक २४.०४.२०१५ सोबतचे सहपत्र

| अ क्र | तात्पुरत्या पदे प्रथमतः ज्या शासन निर्णयाने मंजुर झाले तो शासन निर्णय क्रमांक व दिनांक | पदनाम | पदांची संख्या | वेतनश्रेणी | ज्या शासकीय आदेशाने शेवटी पदे पुढे चालु ठेवण्यात आली तो शानिक्र. व दिनांक | ज्या तारखेला सुन पदे पुढे चालू ठेवले तो दिनांक | लेखाशिर्ष |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ |
| १ | शासन निर्णय क्रमांक आरएलएच /२५९३/६८८ /प्र.क्र. १२७/९३ आ-४ दिनांक :-०२/१२/१९९४ | वैद्यकीय अधिकारी वर्ग २ | १ | १५६००-३९१०० | शानिक्र. अपदे-२०११/ प्र.क्र.१३०/ १२/ आ-४, दि. ६ एप्रिल २०१२ | १.३. २०१४ पासुन पुढे | २२१० वै. सेवा व सा. आ.०१- नागरी आ. से.- विषम चिकित्सा ११०-रुग्णालये व दवाखाने , ११०-१ इतर रुग्णालये व दवाखाने (०५) (०१)- कुटीर रुग्णालये (२२१००३१५) |
| २ | | अधिपरिचारीका वर्ग ३ | १ | ९३००-३४८०० | | | |
| ३ | | कक्षसेवक वर्ग ४ | १ | ४४४०-७४४० | | | |
| | एकुण | | ३ | | | | |